

PRATHAM BOOKS

A Book in Every Child's Hand

# भित्री झुकझुक

**Author:** Bharati Jagannathan
**Illustrator:** Preeti Krishnamurthy
**Translator:** Parna Pethe

वाचन पातळी २



लोलू म्हणजे आपली छान, नवीन झुकझुकगाडी. ती जेव्हा पहिल्यांदा झुकझुकगाडी-घरात आली, तेव्हा सगळ्या जुन्या, वयानं मोठ्या गाड्यांनी तिचं खूप कौतुक केलं. त्या तिला म्हणाल्या, “किती सुंदर आहेस तू! तू किती-किती वेगळ्या आणि छान ठिकाणी जाणार! तुला केवढी मजा येणार!”

लोलू आकारानं मोठी असली, तरी आपली भित्री होती. छोट्या गोष्टींना घाबरायची.




आपलं घर सोडून, बाहेरच्या अनोळखी जगात तिला मुळीच जायचं नव्हतं.

आजूबाजूच्या शेतामधल्या गायी जेव्हा जोरात हम्मा!
असं ओरडायच्या, तेव्हा लोलू बिचारी घाबरून जायची. जेव्हा एखादा कुत्रा लोलूकडे धावत-धावत येई, तेव्हा लोलूला पळत जाऊन कुठेतरी लपून बसावसं वाटे; पण ती घर सोडून पळणार कुठे? मात्र आजूबाजूच्या मोठ्या गाड्यांमुळे तिला जरा तरी सुरक्षित वाटत असे.



या सगळ्यांमध्ये दादू आजोबा लोलूला खूप आवडायचे. ते खूप मोठ्ठे होते आणि खूप ठिकाणी फिरून आले होते. एकदा लोलूच्या घाबरलेल्या चेहऱ्याकडे पाहून ते म्हणाले, "एवढं घाबरण्याचं काहीच कारण नाही, तू तर त्या गाईंपेक्षा आणि कुत्र्यांपेक्षा केवढी मोठ्ठी आहेस!"
"पण ते किती भीतिदायक दिसतात, त्यांच्याकडे केवढी शक्ती आहे!" लोलू म्हणाली. आजोबांनी सांगितलं,



“पण तू एकटी नसणारेस राणी, गाडी चालवणारे बाबूकाका आणि गार्ड कायम असणार आहेत तुझ्यासोबत!”
लोलूला बाबूकाका माहीत होते, आणि तिला त्यांची आजिबात भीती वाटायची नाही. ते खूप प्रेमळ होते. अगदी नीट आणि हळुवारपणे लोलूच्या नाकामागची बटणं ते चालू करायचे. पण ते काका लोलूपेक्षा खूपच छोटे दिसायचे. त्यामुळे आपल्याला काही झालं, तर ते आपल्याला वाचवू शकतील, असं काही तिला वाटायचंच नाही!




शेवटी एकदा तो प्रवासाला जायचा पहिला दिवस उजाडला. लोलू तमिळनाडूच्या  समुद्रापासून थेट जम्मूच्या डोंगरांपर्यंत जाणार होती.

बाबूकाकांनी लोलूचे काही खटके दाबले, काही बटणं सुरू केली आणि मग काय, लोलू सुरू झाली, तिनं तिचा जीव अगदी मुठीत धरून ठेवला होता. “ऊ...,” ती घाबरून जोरात ओरडू लागली; पण माहीत आहे काय झालं?



झुकझुकगाडीची जोरात शिट्टी कशी वाजते, तसा आवाज ऐकू आला. आजूबाजूची कबुतरं, मैना, कावळे, चिमण्या भुर्रकन उडून गेल्या.

ती जशीजशी पुढे-पुढे जाऊ लागली, तशी कुत्री चटकन बाजूला पळाली. लोलूला आश्चर्यच वाटलं!



लवकरच ती घरापासून दूर गेली. तेवढ्यात रुळांवर एक मोठ्ठा बैलोबा बसलेला तिला दिसला. ती घाबरून "ऊ..." ओरडली.

आवाज ऐकून बैलोबांनी शेपटी उडवत धूम ठोकली! आपल्याला पाहून बैलोबा पळून गेला यावर लोलूचा विश्वासच बसेना.




आता मात्र ती धीट झाली. आपण आता वाघोबा किंवा सिंहालापण घाबरायचं नाही, असं तिनं ठरवून टाकलं. पण पुढे काय होणार ते लोलूला कुठे माहीत होतं!



डोंगरातून जाताना एक मोठ्ठी काळी गुहा मधे आली. लोलूला फार फार भीती वाटली. मला नाही आत जायचं ती जोरात किंचाळली पण त्यातून ऐकू आली गाडीची एक जोरदार लांबलचक शिट्टी; मग बाबूकाकांनी मजेत काही बटणं दाबून दिवे लावले. लोलू बोगद्यात शिरताच, त्या अंधाऱ्या बोगद्यात स्वच्छ, पिवळा प्रकाश पडला. बोगद्याच्या बाहेर आल्यावर तिनं हुश्श केलं.




मात्र पुन्हा एकदा ऐकू आली शिट्टीच. आता लोलूला मजाच वाटली! तिनं ठरवून टाकलं, आता कशाला म्हणजे कशालाच घाबरायचं नाही!



आता लोलू आनंदानं शेतातून, पुलावरून, डोंगरांमधून, जंगलांमधून मोठ्यांदा शिट्टी वाजवत प्रवास करते! तुम्ही बसला आहात का लोलूमध्ये कधी? बसून बघा! खूप मज्जा येते!

## Story Attribution:

This story: भित्री झुकझुक is translated by Parna Pethe . The © for this translation lies with Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'The Timid Train', by Bharati Jagannathan . © Pratham Books , 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Other Credits:

This book has been published on StoryWeaver by Pratham Books. The development of the print version of this book has been supported by Rajani Katta and Samir Desai. Pratham Books is a not-for-profit organization that publishes books in multiple Indian languages to promote reading among children. www.prathambooks.org

## Illustration Attributions:

Cover page: Train on a bridge, by Preeti Krishnamurthy © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: Three trains on the railway track, by Preeti Krishnamurthy © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Cow and dog looking at a train, by Preeti Krishnamurthy © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Train on tracks, by Preeti Krishnamurthy © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Man waving flag from train, by Preeti Krishnamurthy © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Man waving from blue train, by Preeti Krishnamurthy © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: Birds on a wire, by Preeti Krishnamurthy © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: Dogs and birds moving away from the train, by Preeti Krishnamurthy © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 9: Cow sitting on train track, by Preeti Krishnamurthy © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 10: Cow in the way of a moving train, by Preeti Krishnamurthy © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.





# भित्री झुकझुक
(Marathi)

लोलू या नव्या झुकझुकगाडीला बाहेर पडायचीच भीती वाटत होती. भीतीनं ती "ऊ.." अशी किंचाळली की गंमत म्हणजे आगगाडीची एक जोरदार शिट्टीच बाहेर पडायची. लोक म्हणायचे, वा! काय छान गाडी आहे. देशभर फिरणाऱ्या लोलूत बसून प्रवासाची मजा लुटायची आहे ना तुम्हाला?

या पुस्तकाची वाचन पातळी २ आहे. ओळखीचे शब्द जाणून वाचणाऱ्या आणि मदत घेऊन नवे शब्द वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.

